**"व्यवसाय शिक्षण संचालनालयाचे बळकटीकरण करणे" या राज्यस्तरीय सर्वसाधारण योजनेस नव्याने प्रशासकीय मान्यता देणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,
शासन निर्णय क्रमांक : व्हीओसी-२०१०/प्र.क्र.३०२/व्यशि-४
दिनांक : ०३ फेब्रुवारी, २०११.

पहा :- प्र.संचालक, (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक

अ) ६/नियोजन/योजना/प्रारूप/२०१०-२०११/१५९, दिनांक. ३० ऑक्टोंबर, २०१०.
ब) ६/नियोजन/योजना/प्रारूप/२०१०-२०११/२०३, दिनांक. २२ डिसेंबर, २०१०.
क) ६/नियोजन/योजना/प्रारूप/२०१०-२०११/२०३, दिनांक. १७ जानेवारी, २०११.

**प्रस्तावना** :- विकासक्षेत्र सामाजिक सेवा - तंत्र शिक्षण भाग-२ खाली व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातर्गत मुख्य कार्यालय, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळ, प्रादेशिक कार्यालये, जिल्हा स्तरावरील जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालये, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा, अशासकीय अनुदानित तंत्र माध्यमिक शाळा व कनिष्ठ महाविद्यालये, अशासकीय विना अनुदानित तंत्र माध्यमिक शाळा व कनिष्ठ महाविद्यालये कार्यरत आहेत.

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील संस्थांमध्ये मुख्यतः अ) पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम ब) +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम, क) +२ स्तरावरील उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम, ड) महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळाचे प्रमाणपत्र अभ्यासक्रम ई) केंद्र शासन पुरस्कृत Modular Employable Skill या ५ व अन्य योजना राबविण्यात येतात. एका शासकीय तांत्रिक विद्यालयाची किमान विद्यार्थी प्रवेश क्षमता १२० (इयत्ता ८ वी) असते. प्रत्येक जिल्हास्तरीय कार्यालयास (जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय) त्यांच्या संबंधित जिल्हयातील किमान ३५ शासकीय व अशासकीय तंत्र माध्यमिक शाळा तथा कनिष्ठ महाविद्यालये, त्यामधील शिक्षक, शिक्षकेत्तर व विद्यार्थी यांचेशी संबंधित शैक्षणिक, प्रशासकीय, भांडार, आस्थापना व वित्तीय बाबींवर सनियंत्रण ठेवण्याचे काम करावे लागते. प्रादेशिक विभागास विभागातील शासकीय व अशासकीय तंत्र माध्यमिक शाळा तथा कनिष्ठ महाविद्यालये यांच्याशी निगडीत असलेल्या शैक्षणिक, प्रशासकीय, वित्तीय बाबींचे सनियंत्रण करावे लागते. तर प्रादेशिक कार्यालये, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालये, शासकीय व अशासकीय संस्था यांच्या शैक्षणिक, प्रशासकीय, आस्थापना भांडार व वित्तीय बाबी वर अंतिमतः व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाचे नियंत्रण असते.

संचालनालया अंतर्गत योजनांची व्याप्ती लक्षात घेतां, शैक्षणिक, प्रशासकीय व वित्तीय बाबींचे प्रभावीपणे नियंत्रण करण्यासाठी पायाभूत सुविधा तसेच आधुनिक तंत्रज्ञान उपलब्ध करून देणे गरजेचे आहे. राज्यातील व्यवसाय शिक्षणाचा दर्जा उंचावण्यासाठी राज्यातील सर्व शैक्षणिक संस्था, कार्यालये हे संगणकीय पध्दतीने जोडणे त्यासाठी वायफाय कनेक्शन निर्माण करणे, विद्यार्थ्यांना जास्तीत जास्त अत्याधुनिक सुविधा उपलब्ध करुन देणे या बाबींचा अंतर्भाव करण्यात आलेला आहे.

मुख्य कार्यालय, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळ, सहा प्रादेशिक कार्यालये व ३१ जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालये यांना पायाभूत सुविधा व आधुनिक तंत्रज्ञान उपलब्ध करून देण्यासाठी शासनाकडे नियतव्ययाची मागणी करणे, नियतव्यय अर्थसंकल्पीत करणे, तसेच मंजूर निधी खर्च करणे यासाठी " व्यवसाय शिक्षण संचालनालयाचे बळकटीकरण करणे" ही राज्यस्तरीय सर्वसाधारण योजना व्यवसाय शिक्षण या उपविकासक्षेत्रातर्गत मागील ब-याच वर्षापासून सुरु आहे. " व्यवसाय शिक्षण संचालनालयाचे बळकटीकरण करणे" या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :- प्रस्तावनेत नमूद बाबी विचारात घेता "व्यवसाय शिक्षण संचालनालयाचे बळकटीकरण करणे" या राज्यस्तरीय सर्वसाधारण योजनेस या शासन निर्णयान्वये नव्याने प्रशासकीय मान्यता देण्यांत येत आहे.

१) सदर योजनेमध्ये खालील बाबींचा समावेश करण्यांत येत आहे.

I) संचालनालय, प्रादेशिक कार्यालये, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळ तसेच जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालये यांना पायाभूत सुविधा उपलब्ध करून देणे व प्रशासकीय इमारतींची बांधकामे राज्य व्यवसाय शिक्षण संशोधन संस्थेच्या कार्यशाळा व प्रशासकीय इमारतीचे बांधकाम.

II) संचालनालय, प्रादेशिक कार्यालये, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळ तसेच जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालये यांच्या सद्यस्थितीतील प्रशासकीय इमारत बांधकामांची दुरूस्ती व नुतनीकरण तसेच इतर बांधकामे.

III) व्यवसाय शिक्षण संचालनालय व त्यांच्या अधिपत्याखालील प्रशासकीय कार्यालयांच्या दैनंदीन व्यवहारासाठी आवश्यक असलेली यंत्रसामुग्री (उदा. संगणक, झेरॉक्स मशिन इत्यादीं), वाहन खरेदी व दुरुस्ती, फर्निचर खरेदी.

IV) संचालनालय तसेच त्यांच्या अधिपत्याखालील सर्व शासकीय कार्यालये व शासकीय संस्थांमध्ये Management Information System विकसित करण्यासाठी तसेच त्याची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक असलेली यंत्रसामुग्री, हत्यारे/उपरकरणे, उपस्कर इत्यादीं खरेदी करणे, सर्व कार्यालयांना इंटरनेट सुविधा उपलब्ध करून देणे, वाय-फाय कॅम्पस, वेब पोर्टर विकसित करणे तसेच त्यांची देखभाल इत्यांदी बाबींवर होणारा खर्च.

V) संचालनायामार्फत राबविण्यात येणा-या योजनांची प्रसिध्दी करणे, विद्यार्थी व पालक यांचेसाठी व्यवसाय मार्गदर्शन मेळावे, रोजगार व स्वयंरोजगार मेळावे, तंत्र प्रदर्शन आयोजित करणे इत्यादी बाबींवर होणारा खर्च.

VI) शासकीय व अशासकीय तंत्र माध्यमिक शाळा तथा कनिष्ठ महाविद्यालयांचे शैक्षणिक निरिक्षण करुन संस्थांचा दर्जा निश्चित करण्याच्या योजनांवर होणारा खर्च (उदा. मंडळाने (Board of Accreditation) नियुक्त केलेल्या अधिकारी व कर्मचारी यांचे मानधन, प्रवास भत्ता, इतर कार्यालयीन खर्च व त्या अनुषांगिक उदभवणारे इतर खर्च )

२) या योजनेखालील कामांना वित्त विभाग शासन निर्णय दिनांक १५ मे, २००९ अन्वये सुधारीत केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ तसेच भविष्यात वेळोवेळी विहित करण्यांत आलेल्या वित्तीय अधिकारान्वये प्राधिकृत करण्यांत आलेल्या प्राधिकरणाची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे बंधनकारक राहील.

३) योजनेखाली हाती घेण्यांत येणा-या बांधकामांची अंदाजपत्रके व नकाशे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून तयार करुन घेण्यांत यावेत. बांधकामांना प्रशासकीय व सचिव समितीच्या मान्यतेनंतर सार्वजनिक बांधकाम विभागास निधी उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संचालक (व्यवसाय शिक्षण) यांची राहील.

४) व्यवसाय शिक्षणांसदर्भात विविध योजनांची माहिती सर्वसामान्य जनतेस व्हावी यासाठी मेळावे व तंत्र प्रदर्शने विभागीय, जिल्हास्तरावर, तालुकास्तरावर आयोजित करण्यांत यावेत.

५) कार्यालयीन यंत्रसामुग्री, वाहन तसेच तत्सम खरेदी उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दिनांक २ जानेवारी, १९९२ अन्वये व शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करुन करण्यांत यावी. कार्यालयीन यंत्रसामग्री व तत्सम खरेदी, मेळावे व तंत्रप्रदर्शने यावर होणारा खर्च आणि मंडळाचे (Board of Accrediation) अनुषांगिक खर्च यासाठी संचालक (व्यवसाय शिक्षण) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यांत येत आहे.

६) या योजनांमधील कामांवर होणारा खर्च "मागणी क्रमांक डब्ल्यू-३, २२०३ तंत्र शिक्षण, ००१ संचालन व प्रशासन, (०२) संचालक, व्यवसाय व शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ००१ (०२)(०२) "व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाचे बळकटीकरण करणे" राज्य योजना (२२०३ ००५ १) या लेखाशिर्षाखाली तसेच बांधकामासाठी होणारा भांडवली खर्च "मागणी क्रमांक एच-८, ४२०२ शिक्षण क्रिडा,कला व संस्कृती कार्य यांवरील भांडवली खर्च, ०२ तंत्र शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, इमारती, १०३ तंत्र शाळा, (००)(०७) मोठी बांधकामे, (४२०२ ०६४ २) ५३ मोठी बांधकामे, (००)(०८) आस्थापना खर्च (४२०२ ०६५१) ६३ आंतरलेखा हस्तांतरण, (००)(०९) हत्यारे व संयंत्र यांचा खर्च (४२०२ ०६६९) ६३ आंतरलेखा हस्तांतरण या लेखाशिर्षाखाली भागविण्यांत यावा.

७) हा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक का.क्र.१४७१/५६९, दिनांक १२/११/२०१० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ अन्वये सुधारीत करण्यांत आलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला, उप विभाग तीन, अनुक्रमांक ४, नियम क्रमांक २७(२) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८) हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेताक क्र. २०११०२०३२०१४१५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(शोभा वि. पत्की)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत :-

१. प्र.संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-०१
२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/नाशिक/पुणे/अमरावती/औरंगाबाद/नागपूर (व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत)
३. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालये (संचालनालयामार्फत)
४. मुख्याध्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्र, (संचालनालयामार्फत)
५. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मंबई (व्यशि-२ अर्थसं/साशि-१)
६. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (का.क्र.१४७१)
७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती (व्यशि-४)

D:\Patki\G.R\Balkatikaran.doc